केंद्र पुरस्कृत योजना सन २०१८-१९
"वन्यजीव अधिवासाचे एकात्मिक विकास कार्यक्रम" योजनांतर्गत राष्ट्रीय उद्याने / अभयारण्याकरीता निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०९.१८/प्र.क्र.३६८/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २६ सप्टेंबर, २०१८.

वाचा :-

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक:- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक :- ०२.०४.२०१८.
२. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक १३-१३/ २०१८-डब्ल्यूएल, दिनांक :- ३१.०८.२०१८.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र कक्ष-२२(६)/ यो/ प्र.क्र.८६/२१७०, दिनांक :- १२.०९.२०१८.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/सी/यो/प्र.क्र.१८/१०४२/१८-१९, दिनांक :- १४.०९.२०१८.

प्रस्तावना :-

"वन्यजीव अधिवासाचे एकात्मिक विकास कार्यक्रम" योजनांतर्गत राष्ट्रीय उद्याने / अभयारण्याचे विकासाकरीता पूर्वी केंद्र शासनाकडून अनावर्ती व आवर्ती बाबींकरीता २४०६ ०७८४ या लेखाशिर्षातंर्गत ५०% केंद्र अनुदान तसेच त्याच अनुरुप राज्य हिस्सा ५० % अंतर्गत २४०६ २३८४ या लेखाशिर्षाचा वापर केजा जात होता.

तथापि सन २०१६-१७ मध्ये सदर योजनेच्या स्वरुपात बदल करण्यात आल्याचे केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल मंत्रायल, नवी दिल्ली यांनी सूचविले. त्या नुसार सन २०१६-१७ मध्ये "वन्यजीव अधिवासाचे एकात्मिक विकास कार्यक्रम" योजनांतर्गत राष्ट्रीय उद्याने / अभयारण्याचे विकासाकरीता अनावर्ती व आवर्ती सर्वसाधारण घटक कार्यबाबींसाठी केंद्र शासनाचा ६०% हिस्सा अंतर्गत २४०६ ०७८४ तर त्याच अनुरुप राज्य शासनाचा ४० % हिस्सा अंतर्गत २४०६ २३८४ व अनावर्ती व आवर्ती विशेष घटक (अनुसूचित जाती उपयोजना) कार्यबाबींसाठी केंद्र शासनाचा ६० % हिस्सा अंतर्गत २४०६ ए१६७ तर त्याच अनुरुप राज्य शासनाचा राज्य हिस्सा ४० % अंतर्गत २४०६ ए१७६ या लेखाशिर्षाचा वापर करण्यात येत आहे.

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत योजना "वन्यजीव अधिवासाचे एकात्मिक विकास कार्यक्रमा" अंतर्गत राष्ट्रीय उद्याने / अभयारण्याचे विकासाकरिता केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक

२ च्या पत्रान्वये रु. १४९५.६७ लक्षचे कार्यबाबींस केंद्र शासनाने मंजूरी प्रदान केलेली आहे. केंद्र शासनाने सुधारीत केंद्र हिस्सा पध्दतीनुसार "वन्यजीव अधिवासाचे एकात्मिक विकास कार्यक्रम" योजनांतर्गत राष्ट्रीय उद्याने / अभयारण्याचे विकासाकरीता सन २०१८-१९ मध्ये केंद्र हिस्स्या अंतर्गत आवर्ती व अनावर्ती (सर्वसाधारण घटक व विशेष घटक {अनुसूचित जाती उपयोजना}) बाबींकरीता प्रथम हप्ता रु. ७१७.९२ लक्ष मंजूर केला आहे, त्या अनुषंगाने राज्य हिस्स्या अंतर्गत आवर्ती व अनावर्ती (सर्वसाधारण घटक व विशेष घटक {अनुसूचित जाती उपयोजना}) बाबींसाठी राज्य शासनास रु. ४७८.६२ लक्ष असे एकूण रु. ११९६.५४ लक्ष निधी मुक्त करणे अपेक्षित आहे. तथापि सन २०१८-१९ मध्ये २४०६ ए१६७ व २४०६ ए१७६ या दोन लेखाशिर्षाअंतर्गत सन २०१८-१९ मध्ये तरतूद करण्यात आलेला नियतव्यय लक्षात घेता केंद्र शासनाने वितरीत केलेल्या निधीपैकी लेखाशिर्षा अंतर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या नियतव्ययाच्या अधिन राहून रु. १०७२.१८५ लक्ष निधी वितरीत करणे अपेक्षित आहे.

**<u>शासन निर्णय-</u>**

सबब आता सदर शासन निर्णयान्वये वर नमूद केल्याप्रमाणे **रु. १०७२.१८५ लक्ष** संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांनी मान्यता दिलेल्या कार्यबाबींवर खर्च करण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) "वन्यजीव अधिवासाचे एकात्मिक विकास कार्यक्रमा" अंतर्गत राष्ट्रीय उद्याने / अभयारण्याचे विकासात्मक कामांसाठी होणारा खर्च I) अनावर्ती व आवर्ती सर्वसाधारण घटक कार्यबाबींसाठी रु. ५८३.३१ लक्ष ६० % केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत विकासात्मक कामांसाठीचा खर्च लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना (००)(०३) वन्यजीवन व्यवस्थापन आणि संरक्षण (५० % केंद्रीय अनुदान) (२४०६ ०७८४) II) त्या अनुरुप राज्य शासनाचा राज्य हिस्सा ४० % करीता रु. ३८८.८७५ लक्ष लेखाशिर्ष लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, (००)(१६) वन्यजीवन व्यवस्थापन आणि संरक्षण (५० % राज्य हिस्सा) (२४०६ २३८४) III) अनावर्ती व आवर्ती विशेष घटक (अनुसूचित जाती उपयोजना) कार्यबाबींसाठी रु. ६०.०० लक्ष ६० % केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत विकासात्मक कामांसाठीचा खर्च लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यारणीय वनीकरण व वन्यजीवन (००) (०१) वन्यजीव अधिवासाचा एकात्मिक विकास कार्यक्रम (५० % केंद्रीय अनुदान) (२४०६ ए१६७) IV) त्या अनुरुप राज्य शासनाचा राज्य हिस्सा ४० % विकासात्मक कामांसाठीचा खर्च लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यारणीय वनीकरण व वन्यजीवन (००) (०१) वन्यजीव अधिवासाचा एकात्मिक विकास कार्यक्रम (५० % राज्य अनुदान) (२४०६ ए१७६) च्या सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पित वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

आ) सदर शासन निर्णयान्वये विरतीत केलेला निधी केंद्र शासनाने संदर्भीय पत्रान्वये मान्यता दिलेल्या तपशीलवार कार्यबाबींवर व सदर कामांना सक्षम प्राधिका-याची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता असल्याखेरीज रक्कम खर्ची टाकण्यात येऊ नये.

इ) वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

ई) प्रस्तावित असलेल्या मोठया बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील.

उ) वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे, वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२६१४५५५८०७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2018.09.26 15:01:17 +05'30'

**( स्वप्निल देशभ्रतार )**
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व, नागपूर.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
६) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७) फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).